**महाराष्ट्र शासन**

क्र.एमएफएस -२०१६ /प्र.क्र. १९० /फ-८
महसूल व वन विभाग, मंत्रालय,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई ४०० ०३२.
दिनांक - ३० जून, २०१७.

विषय :- वेतनवाढीतील फरक, सेवानिवृत्ती वेतन, कुटुंब निवृत्ती वेतनावरील व्याज सेवा उपदान, सेवानिवृत्ती वेतन विक्री, रजा रोखीकरण, भविष्य निर्वाह निधी इत्यादीवरील व्याजाची रक्कम अदा करण्याबाबत.
कै. कृष्णाजी विष्णू प्रभुणे यांचे वारस

वाचा :- १) शासन पत्र क्र.एमएफएस -२०१६ /प्र.क्र. १९० /फ-८, दि.०७/०६/२०१७.
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-२(१)/असं./प्र.क्र.५३/१२२/२०१७-१८, दि.१७/०६/२०१७.
३) उप वनसंरक्षक (प्रा.), सातारा यांचे पत्र क्र.अ/१२/आस्था/८३४/१७.१८, दि.१९/०६/२०१७.

**ज्ञापन :**

श्री.कृष्णाजी विष्णू प्रभूणे, कार्यालय अधिक्षक हे दि.३१/१०/१९८३ रोजी शासन सेवेतून सेवानिवृत्त झाले असून त्यांचे दि.०८/०७/१९९७ रोजी निधन झाले आहे. कै.प्रभुणे यांना विभागीय चौकशी प्रकरणात दिनांक १०.३.५६ ते २९.६.५८ पर्यंत निलंबीत करुन त्यानंतर विभागीय चौकशीच्याआधारे वनसंरक्षक, पुणे वृत्त, पुणे यांनी त्यांचेकडील आदेश क्रं.II/४०२८/दि.३०.६.५८ अन्वये बडतर्फ केले. सदरहू आदेशाविरुद्ध श्री.कृष्णाजी विष्णू प्रभूणे यांनी मुख्य वनसंरक्षक, म.रा.पुणे यांचेकडे अपिल केले. मुख्य वनसंरक्षक, म.रा.पुणे यांनी दि.०८/११/१९६३ रोजीच्या आदेशान्वये शासकीय सेवेत पुर्नस्थापित केले गेले. परंतु विविध स्तरावरील मा.न्यायालयांनी विविध टप्प्यांवर श्री.प्रभुणे यांचे बाजूने निकाल दिल्याने, कै.प्रभुणे व त्यांचे वारसदार यांना वेतनवाढीतील फरक, सेवानिवृत्ती वेतन, कुटुंब निवृत्ती वेतनावरील व्याज, सेवा उपदान, सेवानिवृत्ती वेतन विक्री, रजा रोखीकरण, भविष्य निर्वाह निधी इत्यादीवरील व्याजाबाबत विभागाकडून वेळोवेळी रक्कमा अदा करण्यात आलेल्या आहेत.

२. कै.प्रभुणे यांना व त्यांचे वारसांस देय होणाऱ्या रक्कमेतील व्याजाच्या रक्कमेबाबत मा.मुंबई उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल केलेल्या याचिका क्र. ५५१८, ५५१९ व ५५२०/२००९ मध्ये मा. उच्च न्यायालयाने दि.०६/०४/२०१० रोजी दिलेल्या निर्णयाची अंमलबजावणी करणे आवश्यक आहे.

३. मा. उच्च न्यायालयाने दिनांक ०६/०४/२०१० रोजी दिलेल्या निर्णयानुसार, कै. कृष्णाजी विष्णू प्रभुणे यांचे वारसांस देय रक्कमेवर प्रतिवर्ष/ प्रतिमहा १८% चक्रवाढ व्याजाने रक्कम अदा करणे आवश्यक आहे. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), नागपूर यांनी दि.१७/०६/२०१७ च्या पत्रान्वये तसेच उप वनसंरक्षक (प्रा.) सातारा यांनी दि.१९/०६/२०१७ च्या पत्रान्वये सादर केलेल्या अहवालानुसार, कै.प्रभुणे व त्यांचे वारसदार यांना वेतनवाढीतील फरक, सेवानिवृत्ती वेतन, कुटुंब निवृत्ती वेतनावरील व्याज, सेवा उपदान, सेवानिवृत्ती वेतन विक्री, रजा रोखीकरण, भविष्य निर्वाह निधी

इत्यादीवरील व्याजाबाबत विभागाकडून वेळोवेळी अदा करण्यात आलेल्या रक्कमा वजा करुन (१५,८६,१८२/- या रक्कमेसह) दिनांक १ जुलै २००१ ते ३०/०६/२०१७ अखेर रुपये ७८,१४,६७३/- (अक्षरी रुपये अठ्ठयात्तर लाख चौदा हजार सहाशे त्र्याहत्तर मात्र) एवढी व्याजाची रक्कम अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

४. प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च हा **२०७१ वेतन तथा अन्य निवृत्तीवेतन लाभ या लेखाशिर्षांतर्गत खर्च** या लेखाशिर्षामधून भागवण्यात यावा.

५. सदरहू शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक ११९/व्यय-१०, दि.०४/०५/२०१७ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०६३०१८२५१६८११९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Atul Ashok Kode
Date: 2017.06.30 18:26:51 +05'30'

**( अ. अ. कोदे )**
सह सचिव (वने)
महसूल व वन विभाग

**प्रति,**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. प्रधान मुख्य वनसंरक्षक (कार्मिक), नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प नियोजन व विकास), नागपूर.
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (प्रशासन - दुय्यम संवर्ग), नागपूर.
५. मुख्य वनसंरक्षक कोल्हापूर (प्रा.), कोल्हापूर.
 /- कै.प्रभुणे यांचे वारसदार देय होणारी रक्कम तात्काळ अदा होईल, याची काळजी घ्यावी.
६. उप वनसंरक्षक (प्रा)., सातारा.
 /- कै.प्रभुणे यांचे वारसदार देय होणारी रक्कम तात्काळ अदा करण्यात यावी व तसा अहवाल शासनास सादर करण्यात यावा. तसेच सदर प्रकरणी कोणत्याही प्रकारच्या विलंबास सर्वस्वी आपली जबाबदारी राहील याची नोंद घ्यावी.
७. विभागीय वन अधिकारी, सांगली.
८. महालेखापाल (लेखा व हक्कदारी), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. जिल्हा कोषागार अधिकारी, सातारा
१०. कै.प्रभुणे यांचे वारसदार (उप वनसंरक्षक (प्रा)., सातारा यांचेमार्फत).
११. निवडनस्ती, कार्यासन फ-८.